मोटार वाहन विभागातील सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी या संवर्गातील सीपीटीपी-७ (राज्यसेवा मुख्य परीक्षा-२०१९) या तुकडीतील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन आदेश क्रमांकः एमव्हीडी-०१२२/प्र.क्र.०५/परि-४,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १५ मार्च, २०२४

वाचा :

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/ १२-अ, दि.२०.१.२०१४.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-०५१४/प्र.क्र.२०/ १८ब, दि.७.११.२०१५.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. टिआरएन-०५१७/प्र.क्र.३६/ सीपीटीपी दि.२१.७.२०१७.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन पत्र क्र. टिआरएन-१०२१/प्र.क्र.३७/ सीपीटीपी-ब, दि.२४.१२.२०२१.
५) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०७.०१.२०२२.
६) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १९.०५.२०२२.
७) सामान्य प्रशासन विभाग, शासन पत्र क्र. टिआरएन-०२२४/प्र.क्र.१९/प्रशि-३ दि.१५.०२.२०२४.

शासन आदेश:-

मोटार वाहन विभागातील सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा मुख्य परीक्षा-२०१९ द्वारे निवड होऊन वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थेमध्ये दाखल झालेल्या परिविक्षाधिन अधिकाऱ्यांचे एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ अंतर्गत प्रशिक्षण पूर्ण झाले असून उपरोक्त संदर्भ क्र. ७ येथील दि.१५.०२.२०२४ च्या पत्रान्वये सदर परिविक्षाधिन अधिकाऱ्यांची ज्येष्ठता निश्चित करुन सामान्य प्रशासन विभागाने या विभागास उपलब्ध करुन दिले आहे.

२. प्रस्तुत उमेदवारांकरीता संदर्भाधीन क्र. ५ व ६ वरील दि.०७.०१.२०२२ व दि.१९.०५.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर दोन वर्षाच्या कालावधीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली होती. सदर अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्यासाठी नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशीस अनुसरुन आणि त्यास शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२८.४.२०१५, दि.१६.७.२०१५, दि.१५.६.२०१७, दि.१९.७.२०१७ व दि.१४.०७.२०२१ या अधिसूचनेद्वारे प्रसिध्द केलेल्या महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर

सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम २०२१ मधील तरतुदीनुसार त्यांच्या नांवासमोर दर्शविलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ . क्र. | सहायक प्रादेशिक परिवहन अधिकाऱ्यांची नावे | प्रशासकीय विभागाने वाटप केलेला महसूली विभाग | वाटप केलेल्या महसूली विभागांतर्गत पदस्थापना द्यावयाचे उप प्रादेशिक/ प्रादेशिक परिवहन कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. सौरभ नरेंद्र पवार | कोकण-२ | प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (पश्चिम) | रिक्त पदी |
| २ | श्री. सचिन कमलाकर सावदेकर | पुणे | प्रादेशिक परिवहन कार्यालय, कोल्हापूर | रिक्त पदी |
| ३ | श्री. आशिषकुमार अशोक अय्यर | छत्रपती संभाजीनगर | प्रादेशिक परिवहन कार्यालय, लातूर | रिक्त पदी |

३. सदर अधिकाऱ्यांचे या शासन आदेशाच्या दिनांकापासूनचे वेतन, भत्ते अदा करणे व इतर सेवाविषयक बाबी संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचेकडे राहील.

४. सदर सहायक प्रादेशिक परिवहन अधिकाऱ्यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभाग/सीपीटीपी-ब कडून होणार असून याबाबतचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

५. वरील परिविक्षाधिन अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियमित पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. विहित कालावधीत (पदग्रहण अवधी वगळता) पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यास टाळाटाळ केल्यास अथवा रजेवर गेल्यास अथवा नियुक्तीत बदल करुन घेण्यासाठी अशासकीय व्यक्तीमार्फत शासनावर दबाव आणल्यास त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१६०७४७७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHARAT RAMCHANDRA LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2024.03.16 16:49:34 +05'30'

**( भरत रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री (परिवहन) यांचे अपर मुख्य सचिव

२. अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.

३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४. महालेखापाल, १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.

८. महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर ४४२ ४१०.

९. अवर सचिव (सीपीटीपी-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. प्रादेशिक परिवहन अधिकारी, मुंबई (पश्चिम)/कोल्हापूर/लातूर.

११.सर्व संबंधित अधिकारी (परिवहन आयुक्त कार्यालय यांच्यामार्फत).

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई (पश्चिम)/कोल्हापूर/लातूर.

१३. निवड नस्ती (परिवहन-४).